**खारघर, नवी मुंबई येथे बांधण्यात आलेल्या ग्रामविकास भवनाचा ताबा घेण्याच्या अनुषंगाने समितीचे गठन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्राविभ- २०१६/प्र.क्र.१८१/यो - १**
बांधकाम भवन, मर्झबान रोड, फोर्ट, मुंबई - ४०० ००१
तारीख: ३० डिसेंबर, २०१६.

**प्रस्तावना:**

ग्रामविकास विभागामार्फत खारघर,नवी मुंबई येथील प्लॉट नं.-७६ अे, सेक्टर-२१ येथे ग्रामविकास भवन प्रकल्पाचे बांधकाम करण्यात आले आहे. राज्यातील पंचायत राज पदाधिकारी व अधिकारी यांच्या प्रशिक्षणाची, निवासी प्रशिक्षणाची सोय होणे तसेच स्वयं-सहायता बचत गटासाठी विक्री केंद्राची सोय व्हावी, या उद्देशाने ग्रामविकास भवन बांधण्यात आलेले आहे. खारघर,नवी मुंबई येथे बांधण्यात आलेल्या ग्रामविकास भवन प्रकल्पाचे बांधकाम शासन निधीतून तसेच जिल्हा परिषदांच्या सहभागातून ठेव अंशदान पध्दतीने सिडको मार्फत करण्यात आले आहे. या प्रकल्पासाठी शासन निर्णय दि.२३.११.२०११ अन्वये, एकूण रू.३५६८.३६ लक्ष किंमतीच्या बांधकामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर निधी जिल्हा परिषद व पंचायत समिती प्रशासकीय इमारती बांधकामाकरिता असलेल्या लेखाशिर्ष २५१५ ००५३ या लेखाशिर्षांतून तसेच जिल्हा परिषदांकडून उपलब्ध झालेल्या निधीतून करण्यात आले आहे.सदरहू प्रकल्पाचे स्थापत्य काम दि.१७.७.२०११ रोजी पूर्ण करण्यात आले असून, इमारतीचे अंतर्गत काम दि.१७.८.२०१५ रोजी पूर्ण करण्यात आले. या कालावधीनंतर इमारतीचे अंतर्गत देखभालीचे काम १ वर्षांपर्यंत करारानुसार संबंधित कंत्राटदारामार्फत करण्यात आलेले आहे. तथापि, सदर कालावधी दि.१७.८.२०१६ रोजी संपुष्टात आला असल्याचे सदर इमारतीचा ताबा घेण्याबाबत सिडकोने शासनास कळविले आहे.

**शासन निर्णय-**

ग्रामविकास भवन इमारतीचा ताबा घेण्यापूर्वी सर्व आवश्यक बाबींची तपासणी करण्याकरिता व सदर इमारतीच्या वापरासंदर्भात नियमावली निश्चित करण्याकरिता खालीलप्रमाणे समिती स्थापन करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| मुख्य कार्यकारी अधिकारी, MSRLM | अध्यक्ष |
| अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे | सदस्य सचिव |
| कार्यकारी अभियंता, बांधकाम, जिल्हा परिषद,ठाणे | सदस्य |
| उप अभियंता,बांधकाम, जिल्हा परिषद,ठाणे | सदस्य |
| उप अभियंता (यांत्रिकी), ग्रामीण पाणीपुरवठा, जिल्हा परिषद,ठाणे | सदस्य |
| शाखा अभियंता,विद्युत, जिल्हा परिषद,ठाणे | सदस्य |

२. समितीची कार्यकक्षा - वरीलप्रमाणे स्थापन करण्यात आलेल्या समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल-

१. सदर इमारतीचा सिडकोकडून ताबा घेणे - सदरहू इमारतीचा ताबा घेण्यापूर्वी इमारतीचे झालेले बांधकाम, अंतर्गत सजावटीचे कामे, विद्युत कामे व बांधकाम विषयक इतर सर्व बाबी तसेच पाणी पुरवठा व वीज जोडणी इ. बाबींची तपासणी करणे.
२. ग्रामविकास भवनाचा ताबा घेण्याच्या अनुषंगाने सर्व दस्ताऐवजांची तपासणी करणे तसेच सदर दस्तऐवजांचे जतन करणे.
३. यशदा या प्रशिक्षण संस्थेकडून त्यांच्या इमारतीच्या वापरासंदर्भात असलेल्या नियमावलींचा अभ्यास करुन ग्रामविकास भवनाच्या वापरासंदर्भात नियमावली तयार करणे.
४. यशदा या प्रशिक्षण संस्थेसोबत ग्रामविकास भवनाच्या वापर करण्यासंदर्भात करारनामा (MoU) करणे.
५. ग्रामविकास भवनाच्या दैनंदिन कामकाजासाठी लागणारी आवश्यक पदनिर्मिती संदर्भात अहवाल तयार करणे.
६. ग्रामविकास भवन इमारतीच्या दुरुस्ती व देखभाल संदर्भात कार्यपध्दती निश्चित करणे.

३. वरील प्रमाणे गठीत करण्यात आलेल्या समितीने शासनास ३ महिन्यात अहवाल सादर करेल. तसेच सदर ग्रामविकास भवनाकरिता आवश्यक असणाऱ्या निधी व खर्चासाठी मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, नवी मुंबई यांनी स्वतंत्र खाते उघडावे.

.४ या संकेतस्थळावर उपलब्ध www.maharashtra.gov.in सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने २०१६१२३०१२००१६०२२० करण्यात आला असून त्याचा संकेताक .साक्षांकित करुन काढण्यात येत आहे

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Gopal Mane
Date: 2016.12.30 12:59:55 +05'30'

**डॉ.वसंत माने**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
२. सर्व विभागीय आयुक्त

३. सर्व जिल्हाधिकारी
४. महासंचालक, यशदा , पुणे
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान,बेलापूर,नवी मुंबई
६. मुख्य कार्यकारी अधिकारी,जिल्हा परिषद (सर्व)
७. सह सचिव/उप सचिव(सर्व), ग्रामविकास विभाग, फोर्ट मुंबई.
८. प्राचार्य, ग्रामसेवक प्रशिक्षण केंद्र, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र, संयुक्त प्रशिक्षण केंद्र
९. अतिरिक्त मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद ठाणे
१०. कार्यकारी अभियंता, बांधकाम, जिल्हा परिषद,ठाणे
११. उप अभियंता,बांधकाम, जिल्हा परिषद,ठाणे
१२. उप अभियंता (यांत्रिकी), ग्रामीण पाणीपुरवठा, जिल्हा परिषद,ठाणे
१३. शाखा अभियंता,विद्युत, जिल्हा परिषद,ठाणे
१४. अतिरिक्त संचालक, एकात्मिक ग्रामीण विकास कार्यक्रम कक्ष, बांधकाम भवन, फोर्ट, मुंबई.
१५.निवडनस्ती (कार्यासन योजना - १).